इंडो-डच कृती आराखडया अंतर्गत राज्यात कृषि विज्ञान केंद्र, बारामती या प्रक्षेत्रावर उभारण्यात येणा-या भाजीपाला गुणवत्ता केंद्राच्या प्रकल्प अंमलबजावणीसा प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः फलयो-१११४/प्र.क्र.२०६/९-अे**
मंत्रालय ,मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १२/०१/२०१२४

**वाचा :-**

१) व्यवस्थापकीय संचालक, मराफऔवमं यांचे पत्र क्र.MSHMPB/NHM/IIP/३०३६/२०१४,पुणे. दि.०२/०८/२०१४.
२) केंद्र शासनाचे पत्र क्र.F-४५-१/२०१४-GOI,नवी दिल्ली, दि.११/०९/२०१४.

**प्रस्तावना :-**

राज्यामध्ये विविध भाजीपाला पिकांचे लागवडीखाली असलेले क्षेत्र, तसेच नियंत्रित वातावरणामध्ये भाजीपाला पिकाखालील वाढणारे क्षेत्र विचारात घेता प्रमुख भाजीपाला पिकांची उत्पादकता वाढविणे त्याकरिता प्रगत तंत्रज्ञानाचा अवलंब करणे, नवीन जातीचा अवलंब तसेच लागवड साहित्यांचा वापर करणे, आदर्श कृषि पध्दतीचा अवलंब करणे त्याचबरोबर काढणीत्तोर तंत्रज्ञान, पणन व निर्यात याव्दारे या फळपिकांचे व भाजीपाला पिकांचे मूल्यवर्धन या महत्वांच्या बाबींचा अवलंब शेतक-यांनी करणे गरजेचे आहे. यासाठी त्यांनी फलोत्पादन क्षेत्रातील विकसित उच्च तंत्रज्ञानाचा जास्तीत जास्त अवलंब करण्याची गरज आहे. यासाठी भारत आणि नेदरलॅण्ड (डच) या दोन देशांमध्ये सामंजस्य करारातंर्गत ठोस कृती आराखडा तयार करण्यात आला आहे आणि त्यासाठी केंद्र शासनाने त्यांच्या संदर्भ क्रमांक दोन च्या पत्रान्वये मान्यता प्रदान केली आहे. राज्यात सदर कृती आराखडयाची अमंलबजावणी एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान अतंर्गत करण्यात येणार आहे. या करिता राज्यामध्ये कृषि विज्ञान केंद्र, बारामती येथे भाजीपाला गुणवत्ता केंद्र उभारण्यात येत आहे.

२. सदर प्रकल्पाचा आराखडा नेदरलॅण्ड (डच) देशातील पम एक्सपर्ट (PUM EXPERTS) व कृषि विज्ञान केंद्राचे तज्ञ यांनी तयार केला असून या प्रकल्पाच्या उभारणीसाठी नेदरलॅण्ड (डच) सरकारकडील पम एक्सपर्ट (PUM EXPERTS) यांचे तांत्रिक सहाय्य मिळणार आहे. या प्रकल्पाच्या अमंलबजावणी संदर्भात सविस्तर कार्यप्रणाली निश्चित करून सदर योजनेस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

इंडो-डच कृती आरखडया अतंर्गत कृषि विज्ञान केंद्र, बारामती येथे भाजीपाला गुणवत्ता केंद्र उभारण्यात येणार आहे. प्रस्तुत प्रकल्प सन २०१४-१५ पासून राबविण्यात येणार असून सदर प्रकल्पाचा कालावधी तीन वर्षांचा असून एकूण प्रकल्प रू.९.७० कोटी एवढया निधीचा आहे . सदर प्रकल्पास केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने इंडो-डच कृती आराखडया अंतर्गत राज्यात कृषि विज्ञान केंद्र , बारामती या प्रक्षेत्रावर उभारण्यात येणा-या भाजीपाला गुणवत्ता केंद्राच्या रु.९.७० कोटी (रुपये नऊ

कोटी सत्तर लाख फक्त) एवढया निधीच्या प्रकल्प अंमलबजावणीच्या योजनेस शासनाची प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत प्रकल्प भाजीपाला गुणवत्ता केंद्र, कृषि विज्ञान केंद्र, बारामती, जि. पुणे येथे राबविण्यात येत असून सदर प्रकल्पातील सहभागी संस्था (Project Stakeholders) खालीलप्रमाणे आहेत :-

**१)** एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान, नवी दिल्ली अंतर्गत महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.

**२)** नेदरलॅण्डस दूतावास, नवी दिल्ली व पम एक्सपर्टस (PUM Experts) नेदरलॅण्डस (Advisory body)

**३)** कृषि विज्ञान केंद्र, माळेगाव खुर्द, बारामती, जि. पुणे.

**३**. सदर निधीचा भार खालील संस्था उचलणार आहेत :-

१. एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान, नवी दिल्ली अंतर्गत महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे- **रू.७.२८** कोटी

२. कृषि विज्ञान केंद्र, माळेगाव खुर्द, बारामती, जि. पुणे **रू.२.४२** कोटी

**४. संस्थात्मक रचना:-**

**अ)** राज्यात भाजीपाला गुणवत्ता केंद्र उभारण्याच्या प्रकल्पाचे नियोजन व अमंलबजावणीसाठी त्रीस्तरीय संस्थात्मक रचना राहील. या संदर्भातील प्रकल्प सुकाणु समिती (PROJECT STEERING COMMITTEE) (PSC) ही समिती शासन स्तरावर कार्यरत राहिल. या समितीची रचना पुढीलप्रमाणे राहिल :

| अ.क्र. | पदसिध्द अधिकारी | समितीमधील पदनाम |
|---|---|---|
| १. | मा.अपर मुख्य सचिव, (कृषि व पणन) | अध्यक्ष |
| २. | अभियान संचालक (ए.फलो.वि.अभि.) केंद्रीय कृषि मंत्रालय किंवा त्यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ३. | कौन्सेलर, नेदरलॅण्ड दुतावास, नवी दिल्ली | सदस्य |
| ४. | आयुक्त, कृषि महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य |
| ५. | भारतीय कृषि अनुसंधान, परिषदेचे प्रतिनिधी (डी.डी.जी-हॉर्ट/एक्सटेंन्शन) | सदस्य |
| ६. | संचालक, संशोधन म.फु.कृ.वि. राहुरी | सदस्य |
| ७. | प्रकल्प प्रमुख, भाजीपाला गुणवत्ता केंद्र, के.व्ही.के. बारामती | सदस्य |
| ८. | राष्ट्रीय बागवानी मंडळाचे प्रतिनिधी | सदस्य |
| ९. | अध्यक्ष भाजीपाला उत्पादक संघ किंवा भाजीपाला उत्पादक प्रतिनिधी | सदस्य |
| १०. | व्यवस्थापकीय संचालक, मराफऔवमं, पुणे | सदस्य सचिव |

**ब) प्रकल्प सुकाणु समितीचे अधिकार:-**

१) प्रस्तावित केलेल्या वार्षिक कृती आराखडयास मान्यता देणे.

२) प्रकल्पाच्या प्रगतीचा आढावा घेणे.

३) प्रकल्पाच्या अमंलबजावणीसाठी मार्गदर्शन करणे व त्यासंदर्भात निर्णय घेणे.

४) प्रकल्पाच्या संबंधित विविध यंत्रणामध्ये समन्वय साधणे.

५) केंद्र शासन-राज्य शासन-नेदरलॅण्ड दुतावास तसेच पम एक्सपर्ट (PUM EXPERTS) यांचेमध्ये ही समिती मराफऔवमं, पुणे यांचेमार्फत समन्वय ठेवुन कार्य करेल.

६) प्रकल्पामधील विविध कार्यक्रमांच्या/योजनांच्या घटकांमधील भौतिक व आर्थिक बाबीमध्ये आवश्यकतेनुसार बदल करणे व त्यासंदर्भांत मार्गदर्शन करणे.

**क) प्रकल्प व्यवस्थापन कक्ष** (PROJECT MANAGEMENT UNIT (PMU) :-

हा कक्ष मराफऔवमं, पुणे मंडळ स्तरावर कार्यरत राहिल. या कक्षाची रचना पुढीलप्रमाणे राहिल.

| अ.क्र | पदनाम | पद |
|---|---|---|
| १. | संचालक (फलोत्पादन), मराफऔवमं, पुणे | अध्यक्ष |
| २. | विभाग प्रमुख, फलोत्पादन विभाग, म.फु.कृ.वि. राहुरी | सदस्य |
| ३. | प्रकल्प प्रमुख, कृषि विज्ञान केंद्र, बारामती | सदस्य |
| ४. | वरिष्ठ भाजीपाला पैदासकार, म.फु.कृ.वि. राहुरी | सदस्य |
| ५. | प्रकल्प व्यवस्थापक (इंडो-इस्त्राईल) तथा प्रकल्प समन्वयक, मराफऔवमं, पुणे | सदस्य सचिव |

**ड) प्रकल्प व्यवस्थापन कक्षाची कार्यकक्षा:-**

१) प्रकल्पातील आवश्यक बाबींकरिता निविदा प्रक्रिया पूर्ण करुन त्या व्यवस्थापकीय संचालक, मराफऔवमं, पुणे यांचे मान्यतेने निश्चित करणे.

२) वार्षिक कृती आराखडा सादर करणे.

३) वार्षिक कृती आराखडयाचे घटक व उपघटक ठरविणे.

४) वार्षिक कृती आराखडयांचे अमंलबजावणी वेळापत्रक ठरविणे.

५) वार्षिक कृती आराखडयातंर्गत लागवड सहित्य व उपकरणांच्या खरेदीस सहाय्य करणे.

६) प्रकल्पाचे सनियंत्रण करणे.

७) प्रकल्पासाठी मनुष्यबळ विकास कार्यक्रम ठरविणे.

८) प्रकल्पाचे प्रगतीचा आढावा घेणे.

९) गुणवत्ता केंद्र व नेदरलँड देशातील संबंधित तज्ञ, नेदरलँड दुतावास यांच्यामध्ये समन्वय साधणे व प्रकल्पाची अमंलबजावणी करुन घेणे.

१०) संपूर्ण प्रकल्पाचे प्रकल्प कालावधीत दरमहा आढावा घेऊन प्रकल्प नियोजन अंमलबजावणी यांचे सनियंत्रण करणे.

**इ) प्रकल्पातील समाविष्ठ बाबी व सहभागः-**

| अ.क्र | बाब | एकुण | ए.फलो व. आर्थिक सहभाग | कृषि विज्ञान केंद्र आर्थिक सहभाग |
|---|---|---|---|---|
| १. | पायाभूत सुविधा विकास (Infrastructure Development) | ४.७१ | ४.७१ | - |
| २. | कार्यान्वय खर्च (Operational cost) | १.५० | १.०० | ०.५० |
| ३. | मनूष्यबळ (Human Resources) | १.९२ | - | १.९२ |
| ४. | मनूष्यबळ विकास प्रशिक्षण कार्यक्रम (HRD) | १.२० | १.२० | - |
| ५. | प्रकल्पातील इतर खर्च (Miscellaneous 4 % of Project Cost) | ०.३७ | ०.३७ | - |
| | **एकूण** | **९.७०** | **७.२८** | **२.४२** |

**ई) प्रकल्प कार्यान्वयीन कक्षः-**

हा कक्ष प्रकल्प स्तरावर कार्यरत राहिल. प्रकल्प कार्यान्वयन कक्ष महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळाच्या प्रकल्प व्यवस्थापन कक्षाच्या (PMC) अधिनिस्त कार्यरत राहिल. या कक्षामध्ये प्रकल्प व्यवस्थापक (इंडो-इस्त्राईल), प्रकल्प व्यवस्थापक (नियंत्रित शेती), प्रकल्प प्रमुख, भाजीपाला गुणवत्ता केंद्र व प्रतिनिधी, कृषि विज्ञान केंद्र, बारामती यांचा समावेश राहील.

**य)** भाजीपाला गुणवत्ता केंद्र उभारण्यासाठी कृषि विज्ञान केंद्र, बारामती यांनी करावयाची कार्यवाही:-

१. प्रकल्पाच्या मान्यतेनुसार प्रकल्पात दर्शविलेल्या वेळापत्रकाप्रमाणे बाबनिहाय नियोजन व त्याकरिता कराव्या लागणा-या निविदा प्रक्रियेची कार्यवाही कृषि विज्ञान केंद्राच्या मदतीने मराफऔवमं, पुणे यांनी पूर्ण करावी.

२. निविदा प्रक्रियेनुसार निश्चित झालेल्या व निविदा प्रक्रिये व्यतिरिक्त प्रकल्पातील इतर करावयाच्या बाबी या राबविणेसाठी लागणारे आर्थिक नियोजन व त्यासाठी राबवायाच्या उपाययोजना याबाबतची संपूर्ण माहिती वर्षनिहाय पर्ट चार्ट करुन कृषि विज्ञान केंद्राने मराफऔवमं, पुणे यांना सादर करावी.

३. वर्षानिहाय कृति आराखडयाप्रमाणे बाबनिहाय करावयाच्या कामानुसार अनुदानाची मागणी कृषि विज्ञान केंद्र, बारामती यांनी मराफऔवमं, पुणे यांचेकडे करावी.

४. मागणीनुसार व आवश्यकतेनुसार लागणारे अनुदान मराफऔवमं, पुणे यांचेकडुन वितरीत केले जाईल.

५. प्रकल्पातील समाविष्ठ बाबीकरिता अनुदान खर्च करण्याची जबाबदारी कृषि विज्ञान केंद्र, बारामती यांची राहिल त्याकरिता प्रचलित आर्थिक निकष तसेच लेखाविषयक नियम याचे पालन करण्याची जबाबदारी कृषि विज्ञान केंद्राची राहिल.

६. कृषि विज्ञान केंद्राने "प्रकल्प प्रमुख भाजीपाला गुणवत्ता केंद्र" या नावाने राष्ट्रीयकृत बँकेत खाते उघडावे. या खात्यावर मंडळाकडुन वितरीत केलेले अनुदान जमा करण्यात येईल याच खात्यावरुन प्रकल्पाचे बिलांची देय अदायगी अदा करण्यात यावी. या खात्यावर जमा झालेले व्याज दर सहा महिन्यांनी मराफऔवमं, पुणे यांचे खात्यावर जमा करण्यात यावे.

**र) प्रकल्पातील सहभागी संस्थांची कार्ये व जबाबदाऱ्या:-**

**A) महाराष्ट्र राज्य फलोत्पादन व औषधी वनस्पती मंडळ, पुणे**

१. प्रकल्प प्रस्तावाची मान्यता मिळाल्यानुसार प्रकल्प कार्यान्वीत करणे.

२. भाजीपाला गुणवत्ता केंद्र उभारणीचे सनियंत्रण करणे, अमंलबजावणी करणे, सल्ला देणे, प्रकल्प कार्यान्वीत करण्याकरिता मार्गदर्शन करणे गुणवत्ता केंद्र व एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान, नवी दिल्ली यांचेबरोबर मराफऔवमं, पुणे कार्यालय समन्वयाची भुमिका करेल.

३. मराफऔवमं कार्यालय, प्रकल्प कार्यान्वीत असताना वेळोवेळी प्रकल्पाच्या प्रगतीचा आढावा घेईल. व प्रकल्पावर नियंत्रण ठेवील.

४. प्रकल्पाच्या गरजेनुसार पम एक्सपर्टस् (PUM Experts) नेदरलॅण्डस यांची उपलब्धता करुन त्यांचे भेटीचे नियोजन करुन याकरिता समन्वयन करणे व त्यांचा सल्ला उपलब्ध करुन देणे. नेदरलँड देशाचे दुतावास, प्रतिनिधी, पम तज्ञ, कृषि विज्ञान केंद्र तसेच सहभागी प्रतिनिधी व मंडळ कार्यालय यांचेमध्ये समन्वय घडविणे.

५. मंजुर प्रकल्पानुसार त्या त्या लेखाविषयक मान्यतांनुसार व अनुदानानुसार प्रकल्प प्रमुखास व्यवस्थापकीय संचालक, मराफऔवमं, पुणे यांनी दिलेल्या मान्यतेचे मर्यादेत लेखाविषयक नियमावलीस अनुसरुन खर्च करण्याचे अधिकार राहतील. त्याकरिता कृषि विज्ञान केंद्र, बारामती यांनी सादर केलेल्या आर्थिक प्रस्तावास मराफऔवमं यांनी मान्यता देण्याची कार्यवाही मराफऔवमं, पुणे यांच्याकडून केली जाईल.

६. प्रकल्पाचे लेखापरिक्षणाकरिता एजन्सी नियुक्त करुन लेखा परिक्षण करणे. हयाकरिता सनदी लेखापाल परिक्षकाची नियुक्ती करुन त्यांचेकडुन झालेल्या खर्चाचे लेखापरिक्षण करुन घेण्याची जबाबदारी प्रकल्प प्रमुखाची राहील मात्र एकत्रित उपयोगिता प्रमाणपत्रे केंद्र शासनास सादर करण्याची कार्यवाही मंडळ स्तरावरील सनदी लेखापरिक्षकाकडून करण्यात येईल.

७. प्रकल्पाच्या मार्गदर्शक सुचना अंतिम करुन निर्गमित करणे, व्यवस्थापन करणे, लेखा परिक्षण, मुल्यमापन व सनिंयत्रण करणे.

८. प्रकल्प पूर्ण होताच प्रकल्पाचा अतिंम अहवाल कृषि विज्ञान केंद्राकडून उपलब्ध करुन केंद्रशासनास सादर करणे.

B) **नेदरलॅण्डस दूतावास, नवी दिल्ली व पम एक्स्पर्टस (PUM Experts) नेदरलँड यांची कार्ये व जबाबदाऱ्याः-**

१. पम एक्सपर्टस् (PUM Experts) नेदरलॅण्डस हे डच शासनाने पुरस्कृत केलेले तज्ञ आहेत. हे तज्ञ आराखडा तयार करणे व त्याचे उभारणीकरिता तांत्रिक सहाय्य करतील. भाजीपाला गुणवत्ता केंद्र, पायाभूत उभारणीसाठी मदत करतील.

२. पम एक्सपर्टस् (PUM Experts) हे अनुभवी तज्ञांच्या माध्यमातून सल्ला देतील. ते सल्लागार (Advisory body) म्हणुन काम करतील.

३. प्रकल्पामध्ये आवश्यक असल्यास पम एक्सपर्टस् (PUM Experts) अतिरिक्त कौशल्य, सल्ला मराफऔवमं कार्यालयाचे मागणीनुसार सेवा उपलब्ध करुन देतील, परंतु ते प्रत्यक्ष अमंलबजावणीत सहभागी नसतील. पम यांनी गुणवत्ता केंद्राचे अमंलबजावणी करुन

कार्यान्वीत (Operational) करेपर्यंत त्यांचे कौशल्य व सल्ला, सल्लामसलत या सेवा उपलब्ध करुन दयावयाचा आहेत.

**C) कृषि विज्ञान केंद्र, माळेगाव खुर्द, बारामती यांचे कार्ये व जबाबदाऱ्या:-**

प्रकल्पाची अंमलबजावणी व कार्यान्वयन, कार्यपध्दती, जबाबदारी याकरिता मराफऔवमं, पुणे यांचे बरोबर समन्वय करार (MOU) करण्यात येईल. त्यानुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी कृषि विज्ञान केंद्राची राहील. प्रकल्पातील समाविष्ठ बाबीचे घटकनिहाय नियोजन व कार्यवाही वेळचेवेळी एकात्मिक पध्दतीने (Integrated approach) प्रकल्पाचे काम करणे.

१) प्रकल्पाची अंमलबजावणी करण्याची संपूर्ण जबाबदारी केंद्राची राहील.

२) प्रकल्प वेळेवर पूर्ण करण्याची जबाबदारी या संस्थेची राहील.

३) प्रकल्प मंजूर केल्याप्रमाणे पुर्ण करण्याची जबाबदारी असेल.

४) प्रकल्प वर्षनिहाय अनुसूचि, निधी उपलब्धता नियोजनप्रमाणे योग्य कार्यवाही करणे यासाठी पर्ट चार्ट सादर करतील.

५) केंद्र शासनाने मंजुर केलेल्या कृती आराखडयाप्रमाणे गुणवत्ता केंद्र उभारणी विहित वेळेत पुर्ण करणे.

६) प्रकल्पामध्ये नमुद केलेले उद्देश पूर्ण करण्याची जबाबदारी कृषि विज्ञान केंद्र, बारामती यांची राहिल.

७) मंजुर प्रकल्पाचे अधिन राहुन तीन वर्षाचा कृती आराखडा तयार करावा. त्यामध्ये घटक व उपघटकनिहाय कृती वेळापत्रक आणि आवश्यक निधीचा सामावेश असावा.

८) प्रकल्प अमंलबजावणीसाठी निश्चित केलेल्या त्रिस्तरीय संस्थात्मक रचनेस अनुसरुन प्रकल्प स्तरावर “प्रकल्प कार्यान्वयन कक्ष” ( PROJECT IMPLEMENTING UNIT) स्थापन करावा.

९) गुणवत्ता केंद्राच्या जबाबदा-या पूर्ण करण्यासाठी पूर्ण वेळ प्रकल्प प्रमुखाची निवड करावी आणि प्रकल्प कालावधीमध्ये सदर प्रमुखाचे योगदान पूर्ण वेळ राहील याची दक्षता घ्यावी.

१०) गुणवत्ता केंद्राचे दैनंदिन कामकाजासाठी आवश्यक मनुष्यबळावर येणारा खर्च कृषि विज्ञान केंद्र यांनी त्यांचे स्वनिधीतून (रक्कम रु.१.९२ कोटी) करावा.

११) पम एक्सपर्टस् (PUM Experts) यांच्या या प्रकल्पाचे भेटीकरिता येण्याच्या भारतातील वास्तव्याच्या राहण्याचा व जेवणाचा व फिरतीचा खर्च प्रकल्पाचे आकस्मिक खर्चातून भागविण्यात येईल.

१२) गुणवत्ता केंद्राचे उभारणीसाठी मंडळस्तरावरुन मुक्त केलेला निधी प्रकल्प प्रमुखांना सरळपणे व विनाविलंब उपलब्ध होईल त्यासाठी सदरची रक्कम आरटीजीएस व्दारे मराफऔवमं, पुणे कडून वितरीत केली जाईल. व सदर निधीचे लेखे वेगळे ठेवण्यात यावे. व खर्च केलल्या निधीची सनदी लेखापाल स्वाक्षरीत उपयोगिता प्रमाणपत्रे वेळोवेळी सादर करणे आवश्यक राहिल.

१३) प्रकल्पासाठी आवश्यक लागवड सहित्य, यंत्रसामुग्री, उपकरणे, शेडनेट हाऊस, पॉलीहाऊस इ. ची योग्य तांत्रिक प्रमाणके डच तज्ञांच्या मदतीने ठरविल्यानुसार त्यांची दर्जा व मानांकन तपासून उभारणी करुन घेणे.

१४) सदर प्रकल्पातंर्गत परदेशातून प्राप्त करावयाच्या लागवड सहित्य व उपकरणे आणि यंत्रसामुग्रीसाठी योग्य व आवश्यक त्या आयात प्रक्रियेचा व विहित नियमावलीचा अवलंब करावा.

१५) प्रकल्प कालावधीनंतर गुणवत्ता केंद्राची मालकी संबंधीत कृषि विज्ञान केंद्राकडे राहील आणि सदर केंद्र प्रभावीपणे कार्यरत राहण्यासाठी कृषि विज्ञान केंद्राने आवश्यक ती सर्व संसाधने पुरवावीत.

१६) गुणवत्ता केंद्रामध्ये विकसित होणा-या तंत्रज्ञान प्रात्यक्षिकांचा शेतक-यांमध्ये प्रभावीपणे प्रसार करण्यासाठी निश्चित कृती आराखडा तयार करण्यात येईल.

१७) गुणवत्ता केंद्रामध्ये उभारण्यात येणा-या शेतकरी प्रशिक्षण सुविधांचा लाभ राज्यातील शेतक-यांना प्रथम प्राध्यान्याने व सवलतीच्या दरात देण्यात यावा.

१८) प्रकल्पातील सर्व बाबींची मंजुरीनुसार तांत्रिकदृष्टया योग्य उभारणी करुन ते तंत्रज्ञान शेतक-यांना उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी कृषि विज्ञान केंद्राची राहील.

१९) यंत्रसामुग्री व उपकरणांची योग्य देखभाल व दुरुस्ती करुन त्याच्या नोंदी ठेवणे.

२०) कलमे/रोपांची उत्पादने व विक्री संदर्भातील आवश्यक ती कार्यवाही करणे.

२१) प्रकल्पाचा प्रगती अहवाल वेळोवेळी मंडळ स्तरावरील सनियंत्रण कक्षाला व सर्व संबंधिताना सादर करणे.

२२) प्रकल्प उभारणीसाठी निश्चित केलेल्या यंत्रणा/संख्या/कंपनी यांचेकडून प्रकल्पाची उभारणी करुन घेणे.

२३) प्रकल्प पूर्ण होत असताना प्रकल्पातून महसूल प्राप्त करण्याबाबतचे पूर्ण नियोजन करण्यात बाबतचे व त्या महसूलातून तीन वर्ष पूर्ण झाल्यानंतर गुणवत्ता केंद्र सुरू ठेवण्याची जबाबदारी कृषि विज्ञान केंद्राची राहील.

**ल) सर्वसाधारण सुचना:-**

१. गुणवत्ता केंद्र उभारणीसाठी आवश्यक निविदा प्रकिया पार पाडण्यात याव्यात.

२. महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळाकडून गुणवत्ता केंद्राच्या प्रकल्प आराखडयास तसेच वार्षिक कृती आराखडयास मान्यता दिली जाईल.

३. गुणवत्ता केंद्र प्रकल्पासाठी मंजुर असलेल्या तरतुदीच्या अधीन राहुन आवश्यकतेनुसार वेळोवेळी निधी उपलब्ध करुन दिला जाईल.

४. प्रकल्पाची अमंलबजावणी, निधी व्यवस्थापन, लेखा परिक्षण आणि मुल्यमापनासाठी कार्यपध्दती निश्चित करुन दिली जाईल, तसेच प्रकल्प कालावधीमध्ये मराफऔवमं, पुणे कार्यालयाकडून लेखा परिक्षण केले जाईल.

५. प्रकल्पाच्या प्रभावी अमंलबजावणीसाठी आवश्यकतेनुसार डच तज्ञांच्या भेटी तसेच डच तंत्रज्ञानाबाबतची प्रशिक्षणे आयोजित केली जातील.

६. प्रस्तुत प्रकल्प पूर्ण होत असताना प्रकल्पाचे मुल्यमापन त्रयस्थ संस्थेकडुन करण्यात येईल त्यासाठीचा निधी मराफऔवमं, पुणे यांचेकडील उपलब्ध निधीमधुन करण्यात यावा.

७. उपरोक्त प्रमाणे निश्चित केलेल्या कार्यप्रणालीच्या इंडो-डच कृती आराखडयातंर्गत कृषि विज्ञान केंद्र,बारामतीचे प्रक्षेत्रावर उभारण्यात येणा-या भाजीपाला गुणवत्ता केंद्राच्या प्रकल्पाची अमंलबजावणी काटेकोरपणे करण्यात यावी.

५. प्रस्तुतचे प्रशासकीय आदेश प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारात निर्गमीत करण्यात येत आहेत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०११२१६०४५४४७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAKHARKAR AMOL NILKANTH

Digitally signed by SAKHARKAR AMOL NILKANTH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AAHDDF,CID - 920025, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SAKHARKAR AMOL NILKANTH
Date: 2015.01.13 14:29:13 +05'30'

**अ.नि.साखरकर**
कार्यासन अधिकारी

**प्रति,**

व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, साखर संकुल, शिवाजी नगर, पुणे.

**प्रत,**

१. मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
२. मा. अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक , कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३. आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. उपसचिव (फलोत्पादन) यांचे स्वीय सहाय्यक , कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५. संचालक,फलोत्पादन,कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे.
६. प्रकल्प समन्वयक, कृषि विज्ञान केंद्र, शारदा नगर, बारामती, ता- बारामती, जि-पुणे.
७. निवडनस्ती (९-अे कार्यासन), कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई-३२